**अ) तालुका फळरोपवाटिका चविंद्रा, ता.भिवंडी, जि.ठाणे, येथील प्रक्षेत्रावरील विहीरीवरून पाणी पुरवठा करणे,पाणी साठवण टाकी, पाईपलाईन सुविधा (रु.३२.२६लक्ष) ब) तालुका फळरोपवाटिका सुसंद्री, ता. कळमेश्वर, जि. नागपूर येथील प्रक्षेत्राभोवती तारेचे कुंपण करण्याच्या (रु.३५.८८ लक्ष) कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबतबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक:- फरोवा-२०२०/प्र.क्र.२२/१३-अे,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ०४ फेब्रुवारी,२०२०

संदर्भ :-१) वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३ /विनियम,भाग-२, दि.१७-०४-२०१५.

२) नियोजन विभाग शासन परिपत्रक क्र. ससमा-२०१०/प्र.क्र.४८(भाग-१)/का-१४६१, दि.११/६/२०१८.

३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-२/रोपवाटिका/१७२२/९२९/२०१९, दि. ०९-०१-२०२०.

४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-२/रोपवाटिका/१७२२/९७४/२०१९, दि. ०९-०१-२०२०.

**प्रस्तावना:-**

भाजीपाला रोपमळे,फळेरोपमळे व स्थानिक उद्याने (अनिवार्य/योजनेत्तर) (२४०११७२२) या लेखाशिर्षातर्गत २७-लहान बाधकामे बाबीखाली अ) तालुका फळरोपवाटिका चाविंद्रा, ता. भिवंडी, जि.ठाणे येथील प्रक्षेत्रासाठी विहीरीवरून पाणी पुरवठा करणे, पाणई साठवण इ. सुविधा करणे प्रस्ताव रु.३२,६४,०२१/-(रु.बत्तीस लाख चौसष्ठ हजार एकवीस) ब) तालुका फळरोपवाटिका सुसंद्री, ता.कळमेश्वर,जि.नागपूर येथील प्रक्षेत्राभोवती तारेचे कुंपन करण्याच्या रु.३५,८,००/-(पस्तीस लाख अठ्ठयाऐंशी हजार) प्रस्तावास अनुक्रमे कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा विभाग जिल्हा परिषद ठाणे आणि कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कळमेश्वर यांनी त्यांच्या कामाच्या अंदाजपत्रकास तांत्रीक मंजूरी दिलेली आहे. प्रस्तुत प्रस्ताव विभाग प्रमुखांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार मर्यादेबाहेरील असल्याने प्रशासकीय मंजूरीस्तव कृषि आयुक्तालयाने (संचालक, फलोत्पादन) शासनास सादर केला आहे.त्यानुसार सदर प्रस्तावाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

भाजीपाला रोपमळे,फळेरोपमळे व स्थानिक उद्याने (अनिवार्य/योजनेत्तर) (२४०११७२२) या लेखाशिर्षातर्गत २७-लहान बाधकामे बाबीखाली **अ)** तालुका फळरोपवाटिका चाविंद्रा, ता. भिवंडी, जि.ठाणे येथील प्रक्षेत्रासाठी विहीरीवरून पाणी पुरवठा करणे, पाणी साठवण इ. सुविधा करणे प्रस्ताव

रु.३२,६४,०२१/-(रु.बत्तीस लाख चौसष्ठ हजार एकवीस) **ब)** तालुका फळरोपवाटिका सुसंद्री, ता.कळमेश्वर,जि.नागपूर येथील प्रक्षेत्राभोवती तारेचे कुंपन करण्याच्या रु.३५,८८,०००/-लक्ष (पस्तीस लाख अठ्ठयाऐंशी हजार) प्रस्तावाच्या रक्कमेस वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियमन भाग-२ दि. १७ एप्रिल,२०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग ५ मधील अ.क्र.३ नुसार प्रस्तावित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर निधी हा भाजीपाला रोपमळे, फळरोपमळे व स्थानिक उद्याने (अनिवार्य/ योजनेत्तर) (२४०१ १७२२) या लेखाशिर्षाखाली २७- लहान बांधकामे बाबीखाली सन २०१९-२० साठी मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००२०४१२०९४१६६०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2020.02.04 12:13:21 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२. संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. विभागीय कृषी सहसंचालक,कोकण विभाग,ठाणे.
४. विभागीय कृषी सहसंचालक,नागपूर विभाग,नागपूर.
५. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, नागपूर/ ठाणे.
६. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर,
७. महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर,
८. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,नागपूर/ठाणे.
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०. सहसंचालक लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई -३२,
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. निवड नस्ती (१३-अे)